त्रिपक्षीय करारनामा करुन अवनत वनक्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्यासाठी खाजगी व अशासकीय संस्थांचा सहभाग घेण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्रमांकः एफएलडी-२०१८/प्र.क्र.२८१/फ-१०**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : १४/११/२०१८

**प्रस्तावना -**

अवनत वन क्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्यासाठी खाजगी व अशासकीय संस्थांचा सहभाग घेण्याबाबत त्रिपक्षीय करारनामा करुन वनीकरण हाती घेण्याच्या धोरणास शासनाने दिनांक २३/०९/२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर प्रकरणी निर्णय घेण्याकरीता शासन निर्णय, दिनांक ०७/०३/२०१५ अन्वये गठीत उच्चाधिकार समितीपुढे श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव यांनी सादर केलेला २.७० हेक्टर वनक्षेत्रावर वनीकरण करण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर तथा सदस्य सचिव, उच्चाधिकार समिती यांनी सादर केला होता. उच्चाधिकार समितीच्या दिनांक २३/१०/२०१८ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या प्रस्तावाबाबत चर्चा होऊन समितीने सदर प्रस्तावास मान्यता देण्याची शिफारस केली आहे.

**शासन आदेश-**

उच्चाधिकार समितीने केलेल्या शिफारशीचा साकल्याने विचार करुन, शासन आता असे आदेश देत आहे की, श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव यांनी सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दिनांक ०७/०९/२०१८ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार खाली नमूद केलेल्या वनक्षेत्र असलेल्या ठिकाणी श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव ही औद्योगिक संस्था, श्री.गजानन शिक्षण संस्था, शेगांव ही अशासकीय संस्था व उपवनसंरक्षक, बुलढाणा वन विभाग, बुलढाणा यांच्यामध्ये त्रिपक्षीय करार करुन एकूण २.७० हेक्टर क्षेत्रावर वृक्ष लागवड करण्याचा प्रकल्प राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| गाव | सर्व्हे/कंपार्टमेंट नंबर | वैधानिक दर्जा | एकूण क्षेत्र (हेक्टर) | लागवडीयोग्य क्षेत्र |
|---|---|---|---|---|
| मौजे गिरडा, ता.बुलढाणा, जि.बुलढाणा | १<br>३४३ | राखीव वन | ४८९.२६० | २.७० |
| **एकूण क्षेत्र** | | | | **२.७० हेक्टर** |

२. <u>सदर प्रकल्पास दिलेली मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.</u>

i. वरील क्षेत्रात वृक्ष लागवड करणे, जलमृदसंधारण करणे, ७ वर्षापर्यंत त्यांचे संरक्षण व संवर्धन करण्याचे काम श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव यांचे अर्थसहाय्याने श्री.गजानन शिक्षण संस्था, शेगांव यांनी करावे.

ii. प्रकल्पासाठी व त्याच्या व्यवस्थापनासाठी येणारा सर्व खर्च श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव करेल.

iii. प्रकल्पांतर्गत करण्यात येणारी वृक्ष लागवड ही वन विभागाच्या अधिकाऱ्यांच्या पर्यवेक्षणाखाली करण्यात यावी. वन विभागामार्फत राज्यात ५० कोटी वृक्ष लागवड कार्यक्रम राबविण्यात येत आहे. त्यानुषंगाने पुढील वर्षी १ जुलै ते ३१ जुलै, २०१९ या कालावधीत आयोजित करण्यात येणा-या वृक्ष लागवड कार्यक्रमात वृक्ष लागवड पूर्ण करण्यात यावी.

iv. प्रकल्पासाठी शासन पत्र क्र.एफएलडी-१०१२/प्र.क्र.२०३/फ-१०, दिनांक ०८/०१/२०१३ अन्वये विहित केलेल्या त्रिपक्षीय करारनाम्याच्या मसुद्याप्रमाणे श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव ही औद्योगिक संस्था, श्री.गजानन शिक्षण संस्था, शेगांव ही अशासकीय संस्था व उपवनसंरक्षक, बुलढाणा वन विभाग, बुलढाणा यांच्यामध्ये त्रिपक्षीय करारनामा करण्यात यावा. वन विभागाच्यावतीने त्रिपक्षीय करारनाम्यावर स्वाक्षरी करण्यासाठी उप वनसंरक्षक, बुलढाणा यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

v. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले वन विभागाचे कोणतेही अधिकारी यांना प्रकल्प स्थळी भेट देवून प्रकल्पाचे निरीक्षण करण्याचा व त्याबाबत सुधारणा / सूचना करण्याचा अधिकार राहील.

vi. त्रिपक्षीय करारनाम्यातील कोणत्याही अटीचे श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव ही औद्योगिक संस्था, श्री.गजानन शिक्षण संस्था, शेगांव ही अशासकीय संस्था यांच्याकडून भंग झाल्यास त्रिपक्षीय करारनामा तात्काळ समाप्त करण्याचा अथवा इतर कोणतीही दंडात्मक कार्यवाही करण्याचा अधिकार प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना असेल.

vii. ज्या ठिकाणी शक्य असेल त्या ठिकाणी औद्योगिक संस्थेच्या खर्चाव्दारे रोपवनास काटेरी तारेचे कुंपण **(Barbed Wire Fencing)** करण्यात यावे.

viii. आवश्यकतेनुसार रोपवनास सिंचनाची व्यवस्था करण्यात यावी.

३. वरील ठिकाणी वृक्ष लागवड करताना, ती केल्यानंतरच्या ७ वर्षाच्या कालावधीत आणि भविष्यात कधीही या वनक्षेत्रावर श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव ही औद्योगिक संस्था, श्री.गजानन शिक्षण संस्था, शेगांव ही अशासकीय संस्था यांना कोणताही कायदेशीर व मालकी

हक्क प्राप्त होणार नाही आणि त्याबद्दल त्यांना कोणत्याही न्यायालयात वा प्राधिकरणापुढे कोणताही दावा दाखल करता येणार नाही.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना आवश्यक वाटतील अशा इतर अटी.

५. महाराष्ट्र शासनाच्या दिनांक २६/०६/२०१५ रोजीच्या परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांमधील निकष क्र.१० नुसार वनीकरणासाठी प्रस्तावित क्षेत्र महानगरपालिका व नगरपालिका क्षेत्रापासून १० कि.मी. पेक्षा जास्त अंतरावर असल्यास २५ हेक्टर क्षेत्रावर वृक्ष लागवड करणे आवश्यक आहे. प्रस्तुत प्रस्तावास सदर निकष शिथील करुन एक "विशेष बाब" म्हणून उच्चाधिकार समितीने मान्यता प्रदान केली आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८१११४११५४५२१११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar D Tarange

Digitally signed by Chandrashekhar D Tarange
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fb8c9383a2159ef0954b8bea7a4de7769b9a2308ec cebd89cbd1dd3f1964f665, cn=Chandrashekhar D Tarange
Date: 2018.11.14 12:01:20 +05'30'

**( चंद्रशेखर तरंगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), अमरावती
४) उप वनसंरक्षक, बुलढाणा
५) श्री.गजानन महाराज संस्थान, शेगांव, जि.बुलढाणा-४४४ २०३.
६) श्री.गजानन शिक्षण संस्था, शेगांव, ता.शेगांव, जि.बुलढाणा.
७) निवडनस्ती (फ-१० कार्यासन)